**राज्यातील खाजगी मान्यताप्राप्त प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक शाळांतील शिक्षकेतर कर्मचा-यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः वेतन-२०१९/प्र.क्र.४८/टीएनटी-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार भवन,

मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १४ मार्च, २०२४

**संदर्भ :** -

१. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. एसएसएन-२६९५/प्र.क्र.५५०/माशि-२, दि.३०.०४.१९९८
२. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. एसएसएन-२६९८/प्र.क्र.१५७/माशि-२, दि.२३.०७.१९९८
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक वेतन-११०९/प्र.क्र.४४/सेवा-३, दिनांक १ एप्रिल, २०१०
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक वेतन-११०९/प्र.क्र.४१/सेवा-३, दिनांक ५ जुलै, २०१०

**प्रस्तावना:-**

राज्यातील खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांतील शिक्षकेतर कर्मचा-यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू नाही. शालेय शिक्षण विभागाने राज्यातील मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित शाळांतील शिक्षकेतर कर्मचा-यांना फरकासहित १२ वर्षानंतर देय असलेली कालबध्द पदोन्नती योजना दिनांक ३०.४.१९९८ च्या व दिनांक २३.७.१९९८ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १.१०.१९९४ पासून मंत्रीमंडळाच्या मंजूरीनंतर लागू केली.

वित्त विभागाच्या दिनांक १.४.२०१० च्या शासन निर्णयान्वये सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेमध्ये सुधारणा करुन शासकीय कर्मचाऱ्यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्यात आली आहे. याद्वारे १२ वर्षे व २४ वर्षाच्या नियमित सेवेनंतर राज्य शासकीय कर्मचा-यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचे लाभ अनुज्ञेय करण्याचे आदेश निर्गमित करण्यात आले. तसेच सदर योजना दिनांक ५.७.२०१० च्या शासन निर्णयान्वये १२ वर्षे व २४ वर्षाच्या सेवेनंतर राज्य शासकीय कर्मचा-यांमधील एकाकी पदांना लागू करण्यात आली आहे.

राज्यातील मान्यताप्राप्त शाळेतील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सदरची सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना आपोआप लागू होत नसल्याने शिक्षकेतर कर्मचा-यांना राज्य शासकीय कर्मचा-यांसाठी लागू असलेली सुधारित आश्वासित प्रगती योजना लागू करण्यासंदर्भात होत असलेल्या मागणीच्या अनुषंगाने विधीमंडळामध्ये अनेकवेळा चर्चा झालेली आहे. तसेच अनेक शिक्षकेतर कर्मचारी संघटना सदर मागणीसंदर्भात आग्रही आहेत.

शासन मान्यताप्राप्त खाजगी शाळेतील कनिष्ठ लिपिक व शिपाई या पदावर काम करित असलेल्या सर्वश्री हिरालाल पिपारिये व इतर १० यांनी मुंबई उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्रमांक ८९८५/२०१३ दाखल केली होती. सदर न्यायालयीन प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दिनांक १९.०८.२०१४ रोजी राज्यातील खाजगी संस्थांतील शिक्षकेतर कर्मचा-यांना सुधारित आश्वासित प्रगती योजना लागू करण्याबाबतची कार्यवाही सत्वर करण्याचे आदेश दिले आहेत.

राज्यातील खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येणा-या मान्यताप्राप्त प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक अनुदानित शाळांतील शिक्षकेतर कर्मचा-यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

मा. मंत्रीमंडळाच्या दिनांक ११.०३.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत राज्यातील खाजगी संस्थामार्फत चालविण्यात येणा-या मान्यताप्राप्त प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक अनुदानित शाळांतील शिक्षकेतर कर्मचा-यांना २ लाभांची सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना दिनांक ०१.०१.२०२४ पासून लागू करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

२. वरील निर्णयास अनुसरुन शालेय शिक्षण विभागांतर्गत राज्यातील खाजगी संस्थामार्फत चालविण्यात येणा-या मान्यताप्राप्त प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक अनुदानित शाळांतील शिक्षकेतर कर्मचा-यांना दिनांक १.१.२०२४ पासून लागू करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर योजना पूर्वलक्षी प्रभावाने लागू राहणार नाही तसेच थकबाकी देय होणार नाही.

३. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४८५/२३/सेवा-३/दिनांक २९.१२.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१४१७३२२१७३२१ हा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.14 17:43:28 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. विरोधीपक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
८. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
९. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. शिक्षण संचालक (प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
१४. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१५. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद

१६. शिक्षण निरिक्षक (दक्षिण/उत्तर/पश्चिम),मुंबई
१७. सर्व वरिष्ठ लेखा परिक्षक (शिक्षण विभाग)
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/२, मुंबई/नागपूर
१९. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र- १/२, मुंबई/नागपूर
२०. महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई
२१. संचालक, लेखा व कोषागारे,मुंबई
२२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२३. मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई
२४. उपसंचालक, लेखा व कोषागरे, पुणे नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकणभवन, नवी मुंबई
२५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२६. लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद
२७. सरकार्यवाह, महाराष्ट्र राज्य माध्यमिक शाळा शिक्षकेतर संघटनांचे महामंडळ, रावसाहेब पटवर्धन विद्यालय व ज्यु.कॉलेज, सोने गुरुजी स्मारक, सिंहगड रोड, पर्वती पायथा, पुणे.
२८. वित्त विभाग, नगर विकास विभाग,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
२९. सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३०. निवड नस्ती (टीएनटी-३)